राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे यांचे संगणकावर खाजगी संगणक संस्थेकडून उत्तर पत्रिकांच्या डाटा एन्ट्रीज करुन देण्याच्या कामाच्या दर निश्चिती बाबत.

---

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्र. प्रानिमं-३०९३/१२६/प्र.क्र.२/९३/तेरा-अ

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- १७.२.१९९३.

वाचा :- महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई यांचे क्र. १०९२/मं.प्र/ उ.प/कार्यासन - ३, दिनांक १५ जानेवारी १९९३.

---

शासन निर्णय :-

प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळामार्फत घेण्यात येणा-या परीक्षेचे सुनियंत्रणाचे काम शिखर मंडळ, मुंबई यांचेकडे सोपविण्यात आलेले आहे. महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई यांना परिक्षोत्तर संगणक संस्करणाचे काम राष्ट्रीय सूचना विज्ञान संशोधन केंद्र, पुणे यांचेकडून घेण्यास शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रानिम-२५९२/७७६/१३-अ दि. २७.५.१९९२ द्वारे तत्वत: मान्यता दिलेली आहे.

परिक्षोत्तर कामापैकी, "उत्तर पत्रिकांची डाटा फिडींगचे काम " राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्राकडे सध्या अशाप्रकारे काम करणा-या संस्थेकडून करुन घ्यावे असे ठरले. त्यानुसार त्या संस्थांना दरपत्रक देण्यास सांगितले. मे. योगेश डाटा प्रोसेसिंग सेंटर या संस्थेचे दर सर्वात कमी म्हणजे प्रती उमेदवार रु. ०.२५ असा असल्याने, तो स्विकारण्याची शिफारस सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळाने केली आहे.

सदस्य सचिवांनी शिफारस केलेल्या वरील संस्थेचे दर सर्वात कमी असल्यामुळे त्या दरांना व सदस्य सचिवांनी सुचविलेल्या कालावधीसाठी म्हणजे दि. १.१.९३ ते ३१.१२.९३ किंवा त्यामध्ये ज्या दिनांकाला बदल करण्यात येईल त्यापैकी जे प्रथम घडेल तो पर्यंतच्या कालावधीत वरील दराप्रमाणे काम करुन घेण्यास शासन मंजुरी देत आहे.

याबाबत होणारा खर्च मागणी क्र. ए-८-२०५१ लोकसेवा आयोग, १०३ अधिनस्थ सेवा निवड मंडळे [२०५१-०१११] या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

GR 20040406194121001-0100

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर-१०४/९३/०५५-४, दिनांक २७.१.९३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन मुंबई

२. मुख्यमंत्री यांचे सचिव

३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ [लेखापरीक्षा], मुंबई/नागपूर.

४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२[लेखा व अनुज्ञेयता], मुंबई/नागपूर.

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

७. सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई.

८. सदस्य सचिव, सर्व प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे,

९. जिल्हा कोषागार अधिकारी/ठाणे/पुणे/नासिक/औरंगाबाद/नागपूर/अकोला

१०. उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.

११. वित्त विभाग/[illegible]-४

१२. निवड नस्ती.